सन २०१७-१८ च्या राज्य शिक्षक पुरस्कार सत्कार समारंभाच्या खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीटीसी-२०१८/प्र.क्र.१२०/टीएनटी-४**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट, २०१८

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक क्रमांकः क्र.पीटीसी-२०१५/प्र.क्र.(१२/१५)/टीएनटी-४, दि.१९/१/ २०१५ व शुध्दीपत्र दि.२०/०१/२०१५.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी-२०१६/प्र.क्र.४७/ दि.१४/६/२०१६.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०१६/प्र.क्र.९५/ दि.२१/७/२०१६.
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र.शिसं /राशिपु /समारंभ/२०१६ /विद्याशाखा/४६५१, दि. ६/०७/२०१८ चे पत्र.
५) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक १३ /०७/२०१८.

**प्रस्तावना :-**

महिला व मुलींच्या शिक्षणासाठी विशेष उल्लेखनीय कार्य केलेल्या शिक्षिकांना थोर समाजसुधारक सावित्रीबाई फुले आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार तसेच राज्यातील शैक्षणिक क्षेत्रात उत्कृष्ट काम करणा-या शिक्षकांना "राज्य शिक्षक पुरस्कार" जाहिर करण्यात येणार आहेत. शालेय शिक्षण विभागामार्फत राज्य आदर्श शिक्षक पुरस्कार प्राप्त शिक्षकांना पुरस्कार वितरण करुन त्यांचा सत्कार करण्यासाठी शासन स्तरावर दरवर्षी दिनांक ५ सप्टेंबर या शिक्षक दिनी खास समारंभ आयोजित करण्यात येतो. या समारंभासाठी लागणा-या अंदाजित खर्चाचा प्रस्ताव शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ६/०७/२०१८ च्या उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये शासनास सादर केला. सदर पुरस्कार समारंभासाठी होणाऱ्या खर्चास उपरोक्त संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापि सदरहू कार्यक्रमावरील खर्च भागविण्यासाठी रक्कम संक्षिप्त देयकावर एकरकमी काढण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांना राज्य पुरस्कार, सावित्रीबाई फुले आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार व आदिवासी क्षेत्रात उत्कृष्ट काम करणा-या शिक्षकांना राज्य पुरस्कार या योजनेअंतर्गत सन २०१८-१९ करिता खालील लेखाशिर्षांपुढे नमुद केलेल्या तरतूदीमधील रु.१८१.५० लक्ष (रुपये एक कोटी एक्क्याऐंशी लक्ष पन्नास हजार फक्त ) एवढा निधी शासन मंजूर करीत आहे.

रूपये लाखात

| अ.क्र. | लेखाशिर्ष | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | "मागणी क्रमाक ई-२-२२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० सर्वसाधारण, ८०० इतर खर्च(०२) संकिर्ण,(०२) (०१) आदर्श शिक्षकांना पुरस्कार,दत्तमत(कार्यक्रम) (२२०२ २२९२)" | १७३.०० |
| २ | "मागणी क्रमांक ई-२-२२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ८०० इतर खर्च (०२)संकिर्ण,(०२)(४६) अदिवासी क्षेत्रातील उकृष्ट कामासाठी शिक्षकांना राज्यपुरस्कार कार्यक्रम (२२०२ ३६८२)" | ४.५० |
| ३ | "मागणी क्रमांक ई-२-२२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण, ८०० इतर खर्च (०२) संकिर्ण (०२)(०३) आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार(कार्यक्रम) (२२०२ २८८२)" | ४.०० |
| **एकूण** | | १८१.५० |

२. महाराष्ट्र आकस्मिक खर्च अधिनियम १९६५ च्या परिशिष्ट-१ विवरण पत्र २-मधील अनुक्रमांक ५४ नुसार पारितोषिक वितरण समारंभासाठी संबंधित असलेले अनुषंगिक खर्च संक्षिप्त देयकावर काढणे अनुज्ञेय असुन वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग दोन, अनु.क्र. ११ अ, नियम क्र.३४, वित्त विभाग शासन निर्णय दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये अधिदान व लेखा कार्यालय / कोषागार यामधुन संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याबाबत प्रशासकीय विभागास रु.४.०० लक्ष मर्यादेपर्यंतचे अधिकार आहेत. परंतु या प्रकरणी सदर रक्कम त्यापेक्षा जास्त असल्यामुळे वित्त विभागाच्या अनुमतीनुसार राज्य आदर्श शिक्षक पुरस्कार वितरण समारंभावरील खर्च भागविण्यासाठी एकूण रुपये १८१.५० लक्ष ( रु. एक कोटी एक्क्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त ) रक्कम संक्षिप्त देयकावर काढण्यास खालील अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

१) दि.३१.३.२०१८ नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशिलवार देयकांचा तत्परतेने निपटारा करण्यात येईल.

२) या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

३) या संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची व्यक्तिगत जबाबदारी शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६३७/१८,व्यय-५ दि.२५.७.२०१८ व अनैपचारिक संदर्भ क्र. ४१७/२०१८/विनियम दि. ४.८.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in या शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०८१६१६३६३०६१२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

J. S. Raskar

Digitally signed by J. S. Raskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=04640d2030eaa3854379434ab85482042a072e8a601095b5f7aa8d67b9b02db2, cn=J. S. Raskar
Date: 2018.08.16 16:39:59 +05'30'

**( ज. शि. रासकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य,पुणे

२) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे

३) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे

४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई /नागपूर

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

६) कार्यासन अधिकारी, (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

७) वित्त विभाग, व्यय - ५ / विनियम / अर्थसंकल्प-८

८) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी

९) अपर मुख्य सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहाय्यक

१०) निवडनस्ती-टिएनटी-४